सन २०१६-१७ करीता आदिम जमातीचा विकास या राज्य योजनेंतर्गत आदिम जमातीच्या कुटुंबाकरिता घरकुल बांधण्याच्या खर्चास मान्यता देवून निधी वितरीत करणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आदिम-२०१६/प्र.क्र.८०/का.-१९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २१/०३/२०१७

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक: आदिम-२०१७/प्र.क्र.१३/का-१९, दि. ०६/०२/२०१७

२) शासन निर्णय क्रमांक: शघयो-२०१६/प्र.क्र.३३६/का-१७, दि. ०६/०१/२०१७

३) आयुक्त आदिवासी विकास नाशिक यांचे पत्र क्र.नियो-२०१६/प्र.क्र.१६(१६३)/का.५(३)/११०५१ दि.१७/०२/२०१७

प्रस्तावना (Preamble) -

राज्यातील कातकरी , माडिया गोंड व कोलाम या जमाती आदिम जमाती (Particularly Vulnerable Tribes) म्हणून केंद्रशासनाने अधिसूचित केलेल्या आहेत. या जमाती अतिशय दुर्गम व डोंगराळ भागात वस्ती करुन राहतात. यामुळे या जमातींचा निवासाचा प्रश्न सोडविण्यास प्राधान्य देऊन चालू वर्षी आदिम जमातीचा विकास याखाली रू.१६००.०० लक्ष अर्थसंकल्पीत निधी घरकुलांच्या बांधकामास उपलब्ध करून देण्याचा प्रस्ताव आयुक्त, आदिवासी विकास यांनी वाचा क्र. ०३ अन्वये सादर केलेला आहे. चालू आर्थिक वर्षापासून केंद्र शासनाने प्रधानमंत्री आवास योजनेअंतर्गत बांधण्यात येणाऱ्या घरकुलांच्या बांधकामाच्या किंमतीमध्ये एका घरकुलासाठी सपाट प्रदेशाकरीता रु. १.२० लक्ष व डोंगराळ व नक्षलग्रस्त भागामध्ये रु. १.३० लक्ष याप्रमाणे बदल करण्यात आलेला आहे. सदर बदलाच्या अनुषंगाने मंत्रीमंडळाच्या बैठकीमध्ये दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ वरील शासन निर्णयान्वये शबरी आदिवासी घरकुल योजनेकरीता बदल करण्यात आलेला आहे. आदिम जमातीचा विकास कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणाऱ्या घरकुलांची योजना शबरी आदिवासी घरकुल योजनेच्या धर्तीवर राबविण्याबाबत संदर्भ क्र. १ वरील शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. १ व २ वरील शासन निर्णयान्वये घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी संदर्भ क्र. ३ अन्वये सादर प्रस्तावास मंजुरी देवून निधी वितरीत करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती.

## शासन निर्णय (Government resolution)-

शासन आता या निर्णयाद्वारे आदिम जमातीचा विकासासाठी राज्य योजनेअंतर्गत आदिम जमातीचा विकास याखाली सन २०१६-१७ या वर्षात रू.१६००.०० लक्ष अर्थसंकल्पीत तरतुदीतून शबरी घरकुल योजनेच्या धर्तीवर आदिम जमातीच्या कुटुंबासाठी ११२७ घरकुले शौचालय बांधकामासह (सपाट प्रदेशासाठी प्रति घरकुल रु. १.३२ लक्ष व डोंगरी व नक्षलप्रवण क्षेत्राकरीता प्रति घरकुल रु.१.४२ लक्ष प्रमाणे) बांधकाम करण्याच्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. सदर घरकुल बांधकाम करण्याची योजना ग्रामविकास विभाग अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण मार्फत राबविण्यात यावी. यासाठी पात्र लाभार्थ्यांची यादी ही त्या त्या जिल्ह्याचे संबधित प्रकल्प अधिकारी , एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांच्याकडून राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. या योजनेखाली जिल्हानिहाय /अनुसूचीत जमातीनिहाय घरकुलांचे उद्दीष्ट व प्रस्तावित निधी वितरणाचा लक्षांक खालील तालिकेत नमूद केल्याप्रमाणे राहील.

| अ. क्र. | अनुसूचीत जमाती | जिल्हा | घरकुलांचे उद्दीष्ट | प्रस्तावित वितरण (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १. | कातकरी | रायगड | १२५ | १७७.५० |
| | | ठाणे | १२५ | १७७.५० |
| | | पालघर | १२५ | १७७.५० |
| २. | माडीया | गडचिरोली | ३७७ | ५३५.३४ |
| ३. | कोलांम | चंद्रपुर | १२५ | १७७.५० |
| | | यवतमाळ | १२५ | १७७.५० |
| | | नांदेड | १२५ | १७७.५० |
| | एकुण | | ११२७ | १६००.३४ |

**(टिप:- उपरोक्त लक्षांक प्रति घरकुल रू. १.४२ लक्ष प्रमाणे निश्चित करण्यात आलेले आहेत. उपरोक्त प्रमाणे नमूद लक्षांकापैकी काही जिल्ह्यामध्ये घरकुलांचे बांधकाम सपाट प्रदेशामध्ये करण्यात येणार असल्यास त्या घरकुलांना रु. १.३२ प्रमाणे निधी उपलब्ध करून द्यावा व त्याप्रमाणे लक्षांक वाढविण्यात यावा.)**

या योजनेखाली वितरीत करण्यात येणारा सर्व निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे मार्फत राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृह निर्माण कडे तात्काळ वर्ग करण्यात यावा.

उपरोक्त रु. १६००.०० लक्षचा खर्च मागणी क्र. टी-५, मुख्य लेखाशीर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२ - अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (४०) आदिम जमातीचे विकासासाठी केंद्रीय क्षेत्र योजना, ३१ सहायक अनुदाने (२२२५ c ८८५) (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये अर्थसंकल्पित झालेल्या तरतूदीतून करण्यात यावा.

सदरची तरतूद अर्थसंकल्पिय अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधीच्या मर्यादेत निधी आहरीत करण्याची दक्षता आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी घ्यावी.

उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान ते ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२११६४४०४१३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Lalitkumar R Dhaygude

Digitally signed by Dr. Lalitkumar R Dhaygude
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=77ee43feb646b7ae43865425ca1d67a75cd7607faeae62a4e9bad488155d6d28, cn=Dr. Lalitkumar R Dhaygude
Date: 2017.03.21 16:45:29 +05'30'

(डॉ.ल.रं.धायगुडे)
कक्ष अधिकारी

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग (ग्रामविकास), मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, आदिवासी विकास यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक

८. राज्य संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष- ग्रामिण गृह निर्माण, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
९. नियोजन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. उप सचिव, आदिवासी विकास, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अधिकारी, का-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.